**पशुसंवर्धन विभागातील अधिक्षक गट-क या पदावरुन प्रशासन अधिकारी गट-ब या पदावर पदोन्नती देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन शुध्दीपत्रक क्रमांक:-पसंप्र-२०१२/प्र.क्र.५०४/पदुम-१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
५ वा मजला विस्तार, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- २० ऑगस्ट, २०१५

वाचा :- १) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. पसंप्र-२०१२/प्र.क्र.५०४/पदुम-१, दिनांक ८.१०.२०१४
२) शासन शुध्दीपत्रक, कृषि व पदुम विभाग क्र. पसंप्र-२०१२/प्र.क्र.५०४/पदुम-१, दिनांक १०.६.२०१४

**शासन शुध्दीपत्रक:-**

शासन निर्णय दि.८ ऑक्टोबर, २०१४ नुसार पशुसंवर्धन विभागांतर्गत अधिक्षक गट-क ( वेतनश्रेणी ९३००-३४८००, ग्रेड वेतन ४३००) यांना प्रशासन अधिकारी गट-ब ( वेतनश्रेणी ९३००-३४८००, ग्रेड वेतन ४४००) या पदावर तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नतीने पदस्थापना देण्यात आली आहेत.

२. दि.८ ऑक्टोबर, २०१४ च्या शासन निर्णयातील मुद्दा क्र. ३ येथे **त्यांची सेवाजेष्ठता पदोन्नती नंतरही अबाधित राहील** असे नमुद करण्यात आलेले आहे. शासन निर्णय दि.१०.६.२०१५ मध्ये श्री.गोरख निंबा राजपूत यांना सुधारीत पदस्थापना देताना मुद्दा क्र.२ येथे दि. ८ ऑक्टोबर, २०१४ च्या शासन निर्णयामधील **"इतर बाबी जशाच्या तशा लागू राहतील"** असे नमुद करण्यात आले आहे.

३. शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र.एसआरव्ही-२००१/३६२/ प्र.क्र.२१/२००१/बारा, दि.२९.१०.२००१ मध्ये " पदोन्नतीच्या पदावर कर्मचारी विलंबाने रुजू होण्यास स्वत: जबाबदार असल्यास किंवा तो रजेवर असल्यामुळे असा विलंब झाल्यास कनिष्ठ कर्मचाऱ्यांच्या पदोन्नतीच्या अनुषंगाने मानीव दिनांक व त्या अनुषंगाने वेतन निश्चिती तसेच वेतन व भत्याची थकबाकी अनुज्ञेय होणार नाही" असे नमुद करण्यात आले आहे.

४. श्री.गोरख निंबा राजपूत, अधिक्षक हे सदर पदावर उशीराने रुजू झालेले असल्याने दि. ८ ऑक्टोबर, २०१४ च्या शासन निर्णयामधील **"इतर बाबी जशाच्या तशा लागू राहतील"** हा मुद्दा लागू होत नाहीत. म्हणून शासन निर्णय दि.१०.६.२०१५ मधील मुद्दा क्र.२ "**प्रस्तुत प्रकरणी उपरोक्त दि.८.१०.२०१४ च्या शासन निर्णयामधील इतर सर्व बाबी जशाच्या तशा लागू राहतील"** ऐवजी

**"श्री.राजपूत हे ज्या दिवशी पदोन्नतीच्या पदावर रुजू होतील त्या दिनांकापासून त्यांची सेवा जेष्ठता गणण्यात यावी" असे वाचावे.**

५. सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०८२०१५३२२१४६०१ असा आहे. हे शुध्दीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Patil Bhaskar Raghunath

Digitally signed by Patil Bhaskar Raghunath
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agricultural and ADF, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Patil Bhaskar Raghunath
Date: 2015.08.20 15:36:55 +05'30'

**(भा.र.पाटील)**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत:-**

१. आयुक्त पशुसंवर्धन, पशुसंवर्धन आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. प्रादेशिक पशुसंवर्धन सहआयुक्त, नाशिक.
३. सहआयुक्त, पशुसंवर्धन पशुवैदयकिय जैव पदार्थ निर्मिती संस्था, औंध, पुणे.
४. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक/पुणे.
५. संबंधित अधिकारी व्दारा, आयुक्त पशुसंवर्धन आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. निवडनस्ती.